their arduous and unpleasant duty as smoothly and quietly as it was possible for any troops to achieve. I very much appreciate their work and cooperation they extended to me, my staff and the civil authorities. This Bn is well commanded and should do well in whatever sphere they may be called upon to function." (The Mahar MG Regiment p. 62-63).

मेजर जनरल (नंतर ले. जनरल) **के. एस. थिमय्या** डी. एस. ओ, जी. ओ. सी., चौथी पायदळ डिव्हिजन, यांनी ले. कर्नल **हरिसिंग** यांना पत्र पाठवून तिसऱ्या बटालियनने हिंदु-मुसलमानांना जे संरक्षण दिले, त्याबद्दल जवानांचा गौरव केला.
("25....I have received a letter from the commandant ZHOB Bole, MULTAN, telling me how well you and your men have carried out their task in that area. You had very much difficult task working far away from your Base, underwent great strain and I congratulate you and your Bn on a hard job well done. Earlier your Bn did excellent work in HOSHIARPUR district of which I have personal knowledge. Will you please tell your officers and men how proud I am in having them under my command and I will take the first opportunity of thanking them personally." (Ibid, page 63).

तिसऱ्या बटालियनने डिसेंबर १९४७ च्या काळापर्यंत निर्वासितांना सुरक्षित ठिकाणी नेण्याचे कार्य यशस्वीपणे केले. त्यानंतर बटालियनला गुरुदासपूरला नेण्यात आले. पठाणकोट, डेराबाबा नानक आणि अमृतसर या सीमा भागातील खेड्यातील लोकांना संरक्षण देऊन त्यांच्यात विश्वास निर्माण करण्याचे कार्य बटालियनकडे देण्यात आले. या विस्तीर्ण क्षेत्रात, थोड्या जवानांनी पदयात्रा करून खेड्यातील लोकांना आपले जीवित व कोटकाफीला सुरक्षित राहील असे वातावरण निर्माण करून लोकांना दररोजचे उदरनिर्वाहाचे कार्यक्रम पार पाडण्यास उत्साह दिला. हे कार्य ही बटालियन आठ महिने करीत होती. नंतर १२ फेब्रुवारी १९४८ ला तिला बटाला (जि. गुरुदासपूर) येथे नेले. त्यानंतर कसौली (सिमला हिल्स) येथे नेले. या दोन्ही बटालियनने मशिनगनच्या फायरिंगची खूप मेहनत घेतली. १५ ऑगस्ट १९४८ ला स्वातंत्र्य दिन मोठ्या थाटाने सीमल्याला साजरा झाला. तेव्हां 'सेरेमोनियल परेड' साठी, कसौलीहून या बटालियनला सिमल्यास नेले. त्या परेडमध्ये जवानांनी आपल्या लष्करी वैशिष्ट्याचे जे मनोहरी प्रदर्शन केले ते पाहून सर्व लष्करी अधिकारी व प्रेक्षक आश्चर्याने थक्क झाले. पूर्व पंजाबचे राज्यपाल **श्री. चंदूलाल त्रिवेदी** यांनी जे भाषण केले त्यांत तिसऱ्या बटालियनच्या जवानांबद्दल अत्यंत गौरवपर उद्गार काढले. ते असे—

("It has given me immense pleasure to inspect this parade on the auspicious occasion of the first anniversary of our Independence. Your smart turn-out and excellent bearing have most impressive and I congratulate you all on a perfect display, officers and men of the Mahar Regiment, yours is a very young Bn. hardly 5 years old, but you have received first class training during the war and own the highest praise from top ranking military officers. It was only in the fitness of things that your Regiment was accorded the honour of being a Machine Gun Bn of the 4th Inf. Div. Last year you were engaged on internal defence duty in HOSHIARPUR and later on in evacuating our Hindu Sikh brethren and sisters for the WEST PUNJAB under the distinguished command of Lt. Col. HARI SING, whom I have had a pleasure of knowing for over two years and, who, if I may venture to say, so, possesses all the qualities that a first class officer and leader of men should have. We in the EAST PUNJAB, will always remember with gratitude your most valuable services to us in our hour of need and distress. You are now soldiers of free INDIA and on your devolves primarily the duty of safe-guarding our independence. I am sure that, should an occasion arise, you will give a worthy account of yourselves. You are a part of us, our kith and kin and we are immensely proud of you." (The Mahar MG Regiment, pages 64-65. Address of Sir CHANDULAL TRIVEDI, Governor of East Punjab, to 3rd Mahar MG Battalion, on 26-1-1948 Independence (Republic) Day Celebration Day at Simla, when the Bn. led Ceremonial parade).

या गौरवपर भाषणाचा आशय असा की, तिसऱ्या बटालियनने केवळ आपल्या पांच वर्षांच्या लष्करी जीवनात इतका जोस भरला की जुन्या बटालियनला व अधिकाऱ्यांना या पराक्रमाबद्दल सादर कौतुक वाटते आहे. या बटालियनने पूर्वपंजाबचे जे बहुमोल कार्य केले आहे त्याबद्दल पूर्वपंजाबचे लोक तुम्हा जवानांचे ऋणांकित झालेले आहेत आणि ते जवानांची कृतज्ञतेने सदैव आठवण काढत रहातील. आम्ही तुमचे व तुम्ही आमचे ( आपण सारे एक ) आहोत. हा आपला रक्ताचा संबंध आम्ही कधीही विसरणार नाही. भारताच्या स्वातंत्र्याचे रक्षण करणे हे कार्य–स्वतंत्र भारताचे सैनिक म्हणून तुमच्या हाती आहे, व ते तुम्ही उत्कृष्ट रीतीने यशस्वी करालच कराल, असे आम्हास वाटते.

१५ ऑगस्ट १९४८ च्या 'सेरेमोनियल परेड'नंतर तिसऱ्या महार बटालियनची 'ए' कंपनी ५ इन्फंट्री ब्रिगेडबरोबर **के. व्ही. राव** यांच्या नेतृत्वाखाली काश्मिरच्या रणांगणांत महार जवानांनी लढण्याची शर्थ केली व शत्रूला मागे हटविले. याबद्दल मेजर जनरल **आत्मासिंग** यांनी महार जवानांची, छावणीमध्ये वहावा केली. पुंचच्या भागातील लढाईत तर महार जवानांनी शत्रूंना भूईसपाट केले. या समरभूमीतील निरनिराळ्या भागांत लढल्यानंतर 'ए' कंपनीला जम्मू व काश्मिरमधून हलविण्यात आले, व तिला अंबाल्याला नेण्यात आले. तेथे तिसऱ्या महार बटालियनला, ही कंपनी २२ मे १९४९ ला मिळाली या 'ए' कंपनीतील ४५३२६७९ नाईक **रामा करपकांडे** आणि ४५३११९७२ हवालदार **सदाशिव धाडगे** यांनी वैयक्तिक जी शौर्याची कृत्ये समरांगणात केली त्याबद्दल त्यांचा, अहवालात अधिकाऱ्याने प्रामुख्याने उल्लेख केला. ( कित्ता पा. ६५–६६)

तिसरी महार बटालियन अंबाला येथे १९४९ साली वर्षभर राहिली. त्या काळात तिने फायरिंग, परेड व खेळ यात खूप मेहनत घेतली व आपली सर्वांगीण ताकद वाढविली. ( कित्ता पा. ६६ ).

अंबाला येथे महार रेजिमेंटच्या सर्व बटालियन्स एप्रिल १९५० च्या सुरवातीस, एके ठिकाणी जमा झाल्या. त्यांनी आपले पहिले कौटुंबिक संमेलन ता. ३, ४ व ५ एप्रिलला साजरे केले. इतर बटालियन्स व यांच्यात खेळाचे सामने झाले. त्यांत या महार बटालियन्सनी तीन बक्षिसे मिळविली आणि चॅम्पियन बटालियन शील्ड मिळविले. तिसऱ्या महार बटालियनने २५ जुलै १९५० ला, भारताचे सरसेनापती **के. एम. करीअप्पा,** ओ. बी. ई. यांना ऑफिसर्स मेसमध्ये रात्रौ खाना दिला. या खान्याची उत्तम व्यवस्था केल्याबद्दल, सरसेनापतींनी दुसरे दिवशी सर्वांचे आभार मानणारे पत्र पाठविले. ( कित्ता पा. ६७ )

तिसऱ्या बटालियनने जम्मू काश्मिरमध्ये जावे, असा हुकूम ४ मे १९५१ ला काढण्यात आला. बटालियनने ११ मेला अंबाला सोडले व ती १६ मेला जम्मूला आली. बटालियनच्या सर्व तुकड्या जम्मू व काश्मिर या समरभूमीच्या निरनिराळ्या भागात पाठविण्यात आल्या. (कित्ता)

अनंतनाग या काश्मिरच्या एका शहरात २५-४ १९५२ ला रात्री ११–३० वाजता आग लागली. आगीने आपले उग्र स्वरुप धारण करून घरे व दुकाने भस्मसात करण्याचा सपाटा लावला. आग आटोक्यात येण्याचे चिन्ह दिसेना. जवळच महार बटालियनचा तळ होता. त्यांच्या अधिकाऱ्याने महार बटालियन्सच्या सैनिकांना आग विझविण्यास नागरिकांना मदत करण्यास पाठविले, त्या जवानांनी रात्रौ अडीच वाजेपर्यंत प्रयत्नांची शिकस्त करून आग विझविली आणि बरेचसे होणारे नुकसान वाचविले. आगीत ५० लक्षांचे नुकसान झाले होते पण आणखीन होणारे नुकसान

जवानांच्या प्रयत्नानी टळले म्हणून नागरिकांनी त्यांचे कृतज्ञापूर्वक हार्दिक आभार मानले. जम्मू काश्मिरचे महसूल मंत्री **मिर्झा मोहमद अफजल बेग** यांनी आगीतून जवानांनी जे जे वाचविले होते ते प्रत्यक्ष जाऊन पाहिले आणि त्यांनी ऑफिसरला लिहून कळविले की, महार जवानांनी फार मोठी जनसेवा केली, त्याबद्दल त्यांना धन्यवाद, (किस्ता, पा. ६७-६८)

महार रेजमेंटचा १० व्या वाढदिवसाचा समारंभ सागर येथे करण्यात आला. रेजिमेंटचे कर्नल कमांडर मेजर-जनरल **एस. पी. पी. थोरात** यांना रेजिमेंट, समारंभाचे वेळी सलामी देत आहेत असा फोटो ११-१०-५१ च्या 'टाईम्स' मध्ये प्रसिद्ध झाला होता. फोटोच्या वर "MAHAR REGIMENT'S BIRTH-DAY" या मथळ्याखाली Major General S. P. P. Thorat Colonel — Commandant of Mahar Regiment, one of the youngest regiment, in the Indian Army, taking the salute at the Regiments tenth Birth-day parade held at Sagar recently. Men of this Regiment have own five Vir-Chakras and one Mahavir-Chakra, during the Kashmir Operation (The Times of India, 11-10-1951).

महार रेजिमेंटची माहिती देणारा लेख टाईसच्या २६-१०-५२ (रविवार) च्या अंकात प्रसिद्ध केला होता. महार लोकांची थोडी ऐतिहासिक माहिती देऊन काश्मिरच्या रणांगणात महार जवानांनी कसा अतुल पराक्रम केला याबद्दलची अल्पशी माहिती या लेखात पहावयास मिळते. हा लेख मी खाली देत आहे. २५ ते २८ ऑक्टोबर १९५२ ला रेजिमेंटचे जे दुसरे कौटुंबिक संमेलन भरले त्या प्रसंगाला धरून हा लेख प्रसिद्ध केला होता.

"MAHAR REGIMENT REUNION"
A Regiment of Heroic Exploits

The Mahar (Machine-Gun) Regiment which is one of the youngest regiment in our Army is celebrating its sec[illegible] Reunion at the Regiment Centre in Saugar.

The Reunion will be attended by a large number of ex-servicemen and number of retired and serving officers including Maj.-Gen. S.P.P. Thorat, D.S.O. Chief of the General staff, who is also the Colonel Commandant of the Regiment. The Battalion Commanders' Annual Conference will also be held during the Reunion.

The Mahars are the descendants of the original inhabitants of the Deccan. They are war-like people and from

ancient times have been famed for their skill at arms. In defeated and drove out the Aryan followers of the sage Parasuram, who had settled in North Kanara.

## BEGAN AS FARMERS

In early days, their main occupation was farming the forest land on a small scale and hunting wild game. Gradually, they were absorbed into the population though on a some what lower social level. Today in the Maratta country the Mahar live happily side by side with the rest. Noted for their trust worthiness, they have, for a long time, been employed in protective duties in the villages of the Deccan.

When the British East Indian Company spread its authority over the Deccan, the old Bombay Army was composed chiefly of Mahrattas and Mahars or as they were then called Parwaries. The 102 Grenadiers, then the 1st Regiment of the Bombay Native Infantry were largely Mahars.

On January 1, 1818 this Battalion with some 300 irregular troops and 24 Europeans from the Madras Artillery fought a most memorable battle at Koregaon against 20,000 Peshwa troops led by the renowned Bajirao Peshwa. The 102 Grenadiers joined battle after a long forced march. Although tried and short of provisions, they gave battle to a large and fresh force and it was entirely due to their courage and bravery that they defeated the large Peshwa force. The battle took place south of the river Bhima opposite Koregaon, about 16 miles north-east of Poona and is commemorated by a war memorial bearing the names of the fallen Mahar Heroes and their officers.

## HARDY AND BRAVE

In the Ratnagiri Gazetteer of 1919 it is stated that 2,180 Mahars from Ratnagiri District were on the hardy roll and that they were 'obedient, hardy and brave soldiers.'

During World War I, the Mahars entered the army in thousands mainly in labour units. In January, 1917, Army Headquarters raised two special companies of Mahars for

duty at Secunderabad and Madras. In July in the same year 111 Mahar were raised and did duty on the North-West Frontier and at Aden. At the end of the World War I however, this unit had to be disbanded in the general demobilisation.

At the out-break of World-War II, the Mahars appealed for a special unit to be raised for them. In 1940, two Ambulance Units consisting of Mahars were raised and in 1941, the Mahar Regiment came into existence. The first battalion of the Mahar Regiment was raised in Belgaum in October, 1941, followed by two more battalions which were raised at Kamptee and Nowshera.

## MACHINE GUNNERS

A training company which later developed into the Mahar Regimental Centre was raised on October 1, 1942. The Mahar Regiment which was hitherto an Infantry Regiment was converted into a Medium Machine — Gun Regiment on October 1, 1946, and occupies that unique position even today.

During the emergency which followed Partition, a battalion of the Mahar Regiment did splendid work both in suppressing lawlessness and in the evacuation of both the Muslims and non-Muslim communities from danger areas. For their devotion to duty and impartiality during these troubled times they earned the praise not only from the Government but also from the entire population where they worked.

## HEROISM IN KASHMIR

In the Kashmir War in December, 1947 a battalion of the Mahar Regiment earned undying fame by its bravery and devotion to duty. The part which this battalion played in the battle of Jhangar will be written in the golden letters in the history of the Indian Army.

On December 24, 1947, enemy numbering between four to six thousand attacked our positions near Jhangar, the attack being premeded by heavy mortar and small arms

fire. It looked as if nothing could stop the onslaught of the tribesmen but the Mahars held their posts with matchless courage. In the hundreds of tribesmen were moved down by the devastating fire of the Mahar Machine-gunners who, when their ammunition was exhausted, fought the enemy in a hand-to-hand battle.

The bravery of this Battalion was recognised by the award of one Maha-Vir-Chakra and five Vir Chakras to its man and this was accompanied by a letter which read : a most important part in turning the tide of the battle at a critical moment.

## KEEN SPORTSMAN

Being a war-like people, the Mahars are keen sportsman. They like rough games like wresling and tug-of-war. Delightful folk-dances dating back to ancient times are even today common among the Mahars and they continue to practice this art in their units. Some time ago, the staff and students of the staff-college, Wellingdon, wish to give a present to a selected unit as a gesture of their appreciation of its excellent work during the Kashmir operations. Thus unique privilege was given to a battalion of the Mahar Regiment. The Staff-College sent an individual gift to each men. Their matchless courage and devotion to duty played "Dear Comrade,

We greatly value your heroism and services during the Kashmir campaign. Our good wishes for your quick success are always with you. Please accept this small gift from us." (The Times of India, Sunday 26|10|52).

दुसऱ्या कौटुंबिक संमेलनाच्या प्रसंगी जे खेळाचे सामने झाले त्यात फुटबॉल रस्सी-खेच (टग-ऑफ-वार) व कुस्त्या हे प्रमुख खेळ होते. या खेळात तिसऱ्या बटालियनमधील महार जवानांनी जय मिळविले. तिसऱ्या बटालियनला 'चँपियन बटालियन' हे नांव देण्यात आले. (किस्त्रा, पा. ६८)

एक अधिकारी व दोन मशिनगन तुकड्या हे बराकपूरला २१-९-१९५३ ला पोहोचतील अशा बेताने पाठवून द्या, असा तातडतोडीचा हुकूम तिसऱ्या बटालियनच्या अधिकाऱ्यांना १८ सप्टेंबरला मिळाला. बराकपूरहून कोरियाच्या रणक्षेत्रावर जे हिंदी

लष्कर पाठविण्याचे ठरले होते, त्यात तिसऱ्या बटालियन मधील एक अधिकारी व दोन तुकड्या यांचा समावेश करावयाचा होता. दोन तुकड्या व एक अधिकारी यांची निवड, त्यांची शारिरिक तपासणी आणि इतर सोपस्कार ताबडतोब करून **के. के. एस. बक्षी** यांच्या नेतृत्वाखाली दोन तुकड्या (७५ जवान) अंबाला छावणीतून २० सप्टेंबरला रवाना करण्यात आल्या. २५-९-१९५३ ला या तुकड्या कलकत्त्याच्या डमडम विमान-तळावरून विमानाने कोरियाकडे गेल्या. भारतातून जवान व अधिकारी मिळून ५७५ लोक, ५ अमेरिकन लष्करी, **'ग्लोबमास्टर्स'** विमानांनी कोरियात नेण्यांत आले. कोरियात जनरल ऑफिसर कमांडिंग, कस्टोडियन फोर्स, १) मेजर जनरल. **एस. पी. पी. थोरात**, डी. एस. ओ. हे हिंदी लष्कराचे प्रमुख अधिकारी होते. ते दोन तुकड्यांना भेटण्यास आले, आणि त्या तुकड्यांना ब्रिगेडियर **राजेंदरसिंग पटेल** यांच्या नेतृत्वाखाली कार्यान्वित केले. निरलष्करी भागांत शत्रूना न येऊ देणे, युद्ध कैद्यांना छावणीत आणणे व त्यांच्यावर पहारा करणे आणि प्रसंगोपात युद्धात भाग घेणे, ही कामे महार जवानांना देण्यांत आली. १ नोव्हेंबर १९५३ ला महार जवानांनी आपल्या बटालियनचा दहावा वाढदिवस साजरा केला तेव्हा महार रेजिमेंटचे कर्नल, **मेजर जनरल एस. पी. पी. थोरात डि. एस. ओ.** आणि दोन अधिकारी ब्रिगेडियर **गुरुबक्षसिंग**, डेप्युटी कमांडर, कस्टोडियन कोर्स आणि लेफ्टनंट कर्नल **जी. के. करंदीकर, ए. ए. अँड क्यू, एम. जी. एच. क्यू, सी. एफ. १,** हे समारंभास उपस्थित होते. कोरियांतील सर्वस्वी प्रतिकूल असलेल्या वातावरणांत आपण भारतीयांनी शांतता प्रस्थापित करण्याचे कार्य हातात घेतलेले आहे आणि ते 'आपण यशस्वी करणे, हे आपले कर्तव्य आहे, आणि तुम्ही महार जवान या कर्तव्यात आघाडीवर रहाल अशी मी अपेक्षा करतों, अशा आशयाचे भाषण **श्री. थोरातांनी** केले. ( कित्ता पान ६९-७० )'

हिंदी सैनिकांची जेथे (कोरियांत) छावणी होती त्या भागाला 'हिंद नगर' हे नांव देण्यात आले होते. तेथूनच हिंदी जवानांच्या कार्यक्रमाचे हुकूम बाहेर पडत असत यावेळी कांही प्रसंग इतके स्फोटक होते की त्यातून हिंदी जवान कसे निभावून निघतील, याबद्दल अधिकाऱ्यांना काळजी लागली होती. तीन प्रसंग तर विशेष महत्वाचे होते. एक प्रसंग युद्ध कैद्यांच्या छावणीवर महार जवान पहारा करीत असता एका कैद्याने दुसऱ्या कैद्याचा खून केला व त्याचे शव त्याने छावणीतच पुरले. या गुन्हेगाराला शोधून काढणे व त्याला सजा देणे क्रमप्राप्त होते. या छावणीत हजारो कैदी होते. त्यांच्यावर १७५ महार जवानांना पहारा करावा लागे. त्यांचा पहारा चालू असता हा खून झाला म्हणून गुन्हेगार शोधून काढणे ही जबाबदारीही त्यांचीच होती. त्यांच्या अधिकाऱ्यांने वरिष्ठाकडून हुकूम मिळविला की एखादा कैदी हल्ला करीत आहे अगर पळून जात आहे असे अंदाजाने समजले की जवानांनी त्यांच्यावर गोळ्या झाडाव्यात. मग त्यांत कैदी मेला तरी त्याबद्दल जवानांना जबाबदार धरले जाणार नाही. महार जवानांनी

तो हुकूम सर्व कैद्यांना वाचून दाखविला आणि खूनी कैदी शोधून काढण्यासाठी सर्व कैद्यांना एक-एकटे अधिकाऱ्यापुढे येऊन त्यांच्या प्रश्नांना उत्तरे द्यावीत व कोणी पळून जाण्याचा प्रयत्न केलाच, तर त्याला ठार करण्यांत येईल असे स्पष्टपणे सांगितले. कैद्यांची एक, एक नावे पुकारताच ते कैदी आपल्या तंबूतून बाहेर येऊन अधिकाऱ्यां-च्यापुढे जबानी देत. असा हा क्रम चालू असता एक कैदी छावणीतून पळून जाण्या-साठी धावला, तेव्हां एका महार जवानाने त्याला एकाच गोळीत खाली लोळविले. हाच गुन्हेगार कैदी होता चेअरमन **एन. एन. आर. सी.**, ले. जनरल **के. एस. थिमय्या, डि. एस. ओ.** यांनी कॅप्टन **बक्षींना** पत्र पाठवून, या खुन्याला शोधून काढण्याच्या साहसी कृत्याबद्दल जवान व अधिकारी यांचे अभिनंदन केले.

(I was impressed by the manner in which all ranks conducted themselves during the operation for identification parade. The explosive situation was handled very well indeed. Please convey appreciation to all ranks who participated in the operation." —The Mahar MG Regiment. page 71).

दुसरा प्रसंग १८–१–१९५३ चा. या वेळीही सुभेदार **सी. के. खंडारे** आणि **वीस महार जवान** यांनी युद्ध कैद्यांना अशाच गुन्ह्याबद्दल जाब विचारले व गुन्हेगार शोधून काढले. तिसरा प्रसंग २०–१–१९५४ चा बावीस हजार युद्ध–कैदी युनोच्या लष्करी अधिकाऱ्यांकडे नेऊन पोहोचविणे, हे काम जवानांनी १८॥ तास खपून यशस्वी रीतीने पार पाडले. या कार्यात कैद्याना गडबड करण्यास जवानांनी वाव दिला नाही. हे काम अत्यंत चोख रीतीने बजावल्याबद्दल **जी. ओ. सी.** ने आभार प्रदर्शनाचा हुकूम नगरमध्ये प्रसिद्ध केला.

(I wish to thank each one of you for the magnificent manner in which you worked and behaved throughout this operation. Anyone who has taken part in a mammoth operation of this magnitude can justifiably take pride that he too had contributed to its success. I am confident that as a result of the important, humane and just treatment which you constantly gave to the P.W., they will remember you with gratitude. I shall remember their loud and prolonged cheers of "Sai nara" (Good Bye) as they shook warmly by the hands while crossing the limits of HIND NAGAR. In the end I thank you again for the magnificent work you have done to date. JAI HIND". (The Mahar MG Regiment, pages 71-72; GOC's order, dated 20-1-54, congratulat-

ing two platoons of 3rd Mahar Battalion, for handing over 22,000 non-repatriated prisoners of War in Korea to the U.N. Command in Korea in the most disciplined manner which evoked praises from other military officers also in Korea).

"I would like to take this opportunity to express my heart-felt joy for the operation which you, your JCOs and men have extended to all ranks of this Battalion during your associations with us in KOREA.

महार जवानांनी या युद्धकैद्यांना इतक्या प्रेमाने वागविले होते की, जेव्हा त्यांना 'हिंदनगरातून' जवानांनी युनोच्या लष्करी अधिकाऱ्यांच्या ताब्यात दिले, जात असतां 'बरे येतो, नमस्कार आमुचा' असे म्हणून आपली कृतज्ञता त्या कैद्यांनी महार जवानांना दाखविली. (किता पा. ७०-७३)

कोरियातील कामगिरी संपवून महार जवान, 'एस. एस. कॅप्टन हॉबसन' या ब्रिटिश बोटीने १६-२-१९५४ ला भारतात परत येण्यास निघाले. इतर भारतीय जवान दुसऱ्या चार बोटीतून निघाले. हाँगकाँग, सिंगापूर या मार्गाने बोटी आल्या त्या दोन्ही ठिकाणी तेथील भारतीयांनी, जवानांना मेवा मिठाई व फळे, बोटीवर जाऊन वाटली व त्यांचे अभिनंदन केले. मलायातील भारतीय वकील श्री. गोपाळ मेनन व त्यांच्या पत्नीने जवानांना भेटून त्यांचे अभिनंदन केले व फळे व मिठाई यांचा त्यांना अल्पोपहार दिला, सिंगापूरहून निघालेली बोट मद्रासला ५-३-१९५४ ला सकाळी पोहोचली, तेथे जवानांचे स्वागत करण्यासाठी मद्रासचे मुख्यमंत्री श्री. राजगोपालाचारी, मद्रास एरियाचे जी ओ सी, मेजर जनरल **सी. जे. कोटोच** आणि परदेशी वकील व मद्रासचे प्रमुख नागरिक हे सर्व बोटीवर उपस्थित राहिले. भारताचे पंतप्रधान यांनी जवानांच्या कामगिरीबद्दल प्रसंशा व अभिनंदन करणारे **जे सी ओ** ला पत्र पाठविले होते ते त्यांनी जवानांना वाचून दाखविले. वुमेन हॉस्पिटल कमिटीने जवानांचा सत्कार केला. नृत्य व गायन यांत मद्रासच्या प्रमुख कलावंतानी भाग घेतला होता. हा भव्य व मनोहरी स्वागत समारंभ पाहून आपल्या कार्याचे योग्य चीज झाले असे जवानांना वाटले (कित्ता पा. ७२-७३).

मद्रासहून जवानांचे गट आपल्या पलटणीच्या छावणीत ११-३-१९५४ पर्यंत जाऊन पोहोचले. (कित्ता पा. ७३)

भारतातील निरनिराळ्या भागातील उच्च लष्करी अधिकाऱ्यांनी जवानांचे अभिनंदन करणारी पत्रे त्यांच्या संबंधित अधिकाऱ्यांना पाठविली. तिसऱ्या महार बटालियनमधील ज्या महार जवानांनी कोरियात उत्कृष्टपणे कामगिरी बजावली त्याबद्दल कोरियातून (हिंद नगर) ले. कर्नल **एम. आर. बुधवारे, एम. सी. कमांडर, सिक्सथ बटालियन, जाट रेजिमेंट** यांनी जे पत्र पाठविले त्यांतील एक उतारा असा होता :-

It is really a pleasure for me to review the past few months during which you all the worthy representatives of 3 MAHAR MG have shared our joys and hardships with us over here.

Kindly convey our thanks to your JCOs and men (The MG Regiment, Pages 73-74). A letter of congratulations from Lt. Col. M.R. BUDHWARE, M.C. Commander 6th Bn the JT Regiment, HINDNAGAR, Korea, to the office of 3 Mahar Bn., on the excellent work done by Mahar Jawans in KOREA.

तिसऱ्या महार बटालियनचे अधिकारी

**कमांडिंग ऑफिसर्स**

१) ले. कर्नल **आर. एन. डी. फ्रीयर** एम. सी.
१४ नोव्हेंबर ४३ ते २१ नोव्हेंबर ४४

२) ले. कर्नल **पी. सी. मिडलटोन** पी एस सी
२१ नोव्हेंबर ४४ ते २० नोव्हेंबर ४५

३) ले. कर्नल **एन. डी. फ्रीयर** एम्. सी.
२० नोव्हेंबर ४५ ते १३ फेब्रुवारी ४७

४) ले. कर्नल **खलीद जान,** १३ फेब्रुवारी ४७ ते २८ सप्टेंबर ४७

५) ले. कर्नल **हरि सिंग** पी. एस. सी., २० ऑक्टोबर ४७ ते १२ फेब्रुवारी ४९

६) ले. कर्नल **डी. एस. भंडारी** पी. एस. सी.
१३ फेब्रुवारी ४९ ते २६ जुलै ४९

७) ले. कर्नल **भाग सिंग** एम. एस. सी., २७ जुलै ४९ ते २३ डिसेंबर ४९

८) ले. कर्नल **एच. सी. टेलर,** २४ डिसेंबर ४९ ते २० एप्रिल ५४

९) ले. कर्नल **जि. के. करंदीकर** पी. एस. सी., २१ एप्रिल ५४

**सुभेदार मेजर्स**

१) **भोलाजी रांजणे,** १ नोव्हेंबर ४३ ते सप्टेंबर ४९

२) **सोनु सावंत,** ऑक्टोबर ५१ ते १ सप्टेंबर ५३

३) **बसवंत बंद्सोडे,** १ सप्टेंबर ५३

(The Mahar M.G. Regiment, page 54).

२५ वी बटालियन ( महार रेजिमेंट ) आरगन टँक, बेळगाव येथे १ ऑगस्ट १९४२ ला उभारल्यांत आली. यांत २५ टक्के महाराष्ट्रीय आणि ७५ टक्के महार जवान होते. या बटालियनने सांताक्रुज, मुंबई येथें राहून डॉकयार्ड, मानखुर्द व बुचर बेटे यांच्यावर इतर महत्वाच्या सागरी किनाऱ्यावर पहारे केले. १३ एप्रिल १९४४ ला मुंबई डॉकयार्डस येथे स्फोट झाला व चोहोकडे आगी लागल्या. त्यावेळी आगीपासून सरकारी व खाजगी मालमत्ता वाचविण्याचे अचाट साहसाचे कार्य या बटालियनने केले. हे पाहून एका जनरलने उद्‌गार काढले की, 'कार्यनिष्ठत महार जवान रजपुतांसारखे आहेत. १५ ऑगस्ट १९४५ ला 'यशोदिन' ( व्हिक्टरी–डे ) मुंबईत साजरा करण्यात आला तेव्हां या बटालियनने मुंबईत सर्व भागात फिरून उत्तम बंदोबस्त ठेवला. १५ ऑगस्ट १९४५ ला ही बटालियन देवळालीला गेली. तेथे १ मार्च १९४६ ला या बटालियनला सांगण्यात आले की ही बटालियन बंद करण्यांत येणार आहे. कॅप्टन **व्ही. एन्. लिमये** यांनी या बटालियनला देवळालीहून कामटीला नेले; आणि तेथे १५ मार्च पर्यंत बटालियन बरखास्त करण्याची सर्व कामे उरकून घेण्यात आली. या बटालियतमधील बरेच महार जवान व त्याचे अधिकारी यांना महार मिडियम गन या रेजिमेंटच्या इतर बटालियनमध्ये सामील करून घेतले. ( किस्सा पा. ७६–७८ ).

### या २५ व्या बटालियनचे अधिकारी

१) ले. कर्नल **व्ही. चँबियर** १ ऑगस्ट ४२

२) ले. कर्नल **एच. एस. आय पिअरसन** १९ सप्टें. ४२

३) ले. कर्नल **सी. बी. पुनाप्पा** २१ जून ४३

४) ले. कर्नल **आर. एच. लो.** २४ फेब्रुवारी ४६ ते १५ मे ४६

### सुभेदार मेजर

१) ऑनरबेल सब–मेजर **लाडकोजीराव भोसले**
बहादूर ओ. बी. आय.

२) सुभेदार मेजर **रावजी सावंत** जानेवारी ४६ ते मे ४६

जम्मू आणि काश्मिरच्या समरभूमीवर मराठे आणि महार जवान शौर्याने, उत्साहाने आणि चिकाटीने लढले म्हणून त्यांना शत्रूंना खडे चारता आले, आणि दिगंत किर्ती मिळविता आली. मराठे जवान 'हर हर महादेव' व 'छत्रपति शिवाजी महाराज की जय' अशा विजयी घोषणा देत शत्रूवर हल्ले करीत. महार जवानही या घोषणा करीत आणि शिवाय त्यांना लढण्यास स्फूर्ती देणारी आणखी एक घोषणा '**जय भीम**' ही होय ! जम्मू व काश्मिर या समरांगणांत जे महार जवान कामास आले त्यांची यादी खालील प्रमाणे : —

## ROLL OF HONOUR

## THOSE WHO DIED IN J. & K. OPERATION

| | | |
|---|---|---|
| 269 | Hav.....RAWOO KAMBALE | |
| 6015 | Hav.....DADU PARANJAPE | |
| 3625 | Hav.....PANDURANGA RASAL | |
| 267 | Hav.....SEWAK JADHAV | |
| 514 | Naik BARKYA KAMBLE | |
| 3508 | P\|L\|Nk. | MARUTI TAMBE |
| 4529197 | Sep. | YESHWANT KAMBLE |
| 4528471 | ,, | MARUTI SARJE |
| 6472 | ,, | GURUBALA SABLE |
| 6151 | ,, | TUKARAM KAMBLE |
| 7331 | ,, | SONYA POWER |
| 4528475 | ,, | SURYAJI HATE |
| 7367 | ,, | JANU TAMBE |
| 4528865 | ,, | GANGARAM MOHITE |
| 4529634 | ,, | NANA SONAWANE |
| 4530025 | ,, | BABU KHANDIZOD |
| 4529523 | ,, | KONDIBA AKHADE |
| 4528523 | Swpr. | BABU LACHMAN |

(The Mahar MG Regiment page 86)

खालील जवानांना शौर्याची कामे केल्याबद्दल सरसेनापतींची प्रशस्तीपत्रे मिळाली :

## RECEPIENTS OF C-IN-C's COMMENDATION CARDS DURING PRE-PARTITION PERIOD

| | | |
|---|---|---|
| 22952-10 | Sub. | (Now Cap) RAO S. WANKHADE |
| 16767-10 | Sub. | PANDIT KHADTALE |
| 4531966 | Hav. | KRISHNA SONAWANE M.V.C. |
| 4528664 | Sep. | PUNDALIK MAHAR, Vr.C. |

——x——

RECEPIENTS OF MENTION-IN-DESPATCHES
CERTIFICATES IN J & K OPERATIONS

18687-10 Sub. BIKURAM GHATGE
46475-10 Jem. MARUTI KAMBLE
41 (NYA) Jem. ANANT SAWANT
4531828 Hav. MAHADEO MOHITE
4531813 „ BHUJANGA KAMBLE
4531827 „ RAMACHANDRA ALVE
4531972 „ SAHADEV GHADGE
4531907 „ BARKU JADHAV
4532379 „ RAJARAM KENGALE
35 Naik BAPU KAMBLE
4532679 Naik RAMA KARAPKANDE
4531850 L|Naik SHRIPAT SALVI
4532532 Sep. APPA DHALU
(The Mahar MG Regiment, page 87).

१११ वी महार बटालियनने (१९१४–१८) खांद्यावरील पट्टा वापरला तो "111 MAHARS" या अक्षरांचा होता. १९४२–४६ च्या काळांत महार रेजिमेंटने जवानांच्या टोपीवर जो पट्टा वापरण्यासाठी घेतला त्यावर कोरेगांवचा विजयस्तंभ होता. त्याच्या दोन्ही बाजूना उतरत्या पट्यावर "कोरे" (उजवी बाजू) आणि "गांव" (डावी बाजू) आणि विजयस्तंभाच्या तळाशी "महार" ही अक्षरे वर्तुळाच्या एका भागात बसविलेली होती. हा बॅज **मेजर ईलमॉर्टल मॅन्स** या दुसऱ्या महार बटालियनच्या अधिकाऱ्याने तयार केला होता. (किचा पा. ८९) महार रेजिमेंटसचे रूपांतर १ ऑक्टोबर १९४६ ला मिडियम मशिनगन रेजिमेंटमध्ये झाले. तेव्हा टोपीवरील वापरण्याचा बॅज तयार करण्यांत आला. त्यांत मध्यावर विजयस्तंभ, त्याला छेदणाऱ्या दोन म्यान केलेल्या तरवारी, परस्परांना खालच्या बाजूस छेदणाऱ्या दाखविण्यात आल्या होत्या. टोकांना जोडणारी एक कमान तरवारीच्या म्यानांच्या टोकावर टेकलेली आणि त्या कमानीवर KORE उजवी बाजू व 'GAON' (डावी बाजू) ही अक्षरे कोरली होती. तळाच्या पट्टोवर 'The MAHAR REGIMENT' ही अक्षरे होती. स्वातंत्र्य प्राप्तीनंतर जो बॅज टोपीसाठी तयार केला त्यांत स्तंभाच्या ठिकाणी उभी कटयार काढली बाकीचे सर्व पूर्वी प्रमाणेच होते; मात्र वरील टोकांच्या कमानीवरील KORE ऐवजी 'यश' व GAON ऐवजी 'सिद्धी' ही अक्षरे घालण्यात आली (किचा, पा. ९०) या चार बॅजेसची चित्रे येणे प्रमाणे.

(1) १११ व्या महार बटालियने १९१४ ते १८ पर्यंत वापरलेली खांद्यावरचा बॅज.

(2) हा टोपीवरचा बॅज़ १९४२–१९४६ पर्यंत महार १११ बटालियसने 'इन्फट्री रेजिमेंट' म्हणून काम केले त्यावेळी वापरला गेला. या बॅजचे डिझाईन २ न्या महार रेजिमेंटचे अधिकारी मेजर **ईल मार्टलमनंस** यांनी तयार केले होते. मध्य भागात कोरेगावचा विजयस्तंभ, ब्रिटिश व पेशवे यांच्या मध्ये झालेल्या लढाईत ब्रिटिशांच्या वतीने शौयने लढून विजय संपादन केलेल्या महार वीरांच्या स्मरणार्थ होता.
(The Mahar MG Regiment p. 89)

(3) १ ऑक्टोबर ४६ मध्ये १ ल्या महार रेजिमेंटचे रुपांतर मिडियमगन रेजिमेंटमध्ये झाल्यावरचा टोपीवर लावायचा बॅज अशा प्रकारचा वापरात आला.

(4) (१५ ऑगस्ट १९४७ च्या) स्वातंत्र्यानंतर पेशव्यांवर मिळविलेल्या विजयाचे प्रतिक, ब्रिटिश सत्तेत कायम असणारा विजयस्तंभ बदलून त्या जागी कट्यार आली व "कोरेगांव" ऐवजी "यश सिद्धी" ही अक्षरे असलेला बॅज वापरात येऊ लागला आहे. या बॅजचे डिझाईनने Regt. Centre केले.

**ले. कर्नल घाशीराम** यांनी सागर येथे ३० नोव्हेंबर १९५३ ला महार रेजिमेंटल सेंटरचे नेतृत्व स्वीकारले. त्यांनी सेंटरमध्ये उपयुक्त योजना सुरू केल्या. त्यांनी हिंदीत महार सैनिक संचलन गीत "महार सैनिक" हे स्वतः रचले व "A Marching Song of MAHAR SAINIK" म्हणून प्रचारांत आणले. (किसा पा. २४)

ते गीत असे :—

## "महार सैनिक"

१

वीर शिवजी के बालक हम,
हैं महार सैनिक हम, हम, हम ।
ना मशिनगन मे ही कौशल,
निपुण सभी शस्त्रो में हम, हम ।
वीर शिवाजी के बालक हम ॥

२

जन सेवक हैं, सैनिक-वर हैं,
दृढ़ता शील दया के घर हैं ।
मातृ-भूमि-सेवा-हित करते,
हम हरदम कर श्रम, श्रम, श्रम ।
वीर शिवाजी के बालक हम ॥

३

चोह पड रही धूप कडी हो,
वर्षा की लग रही झडी हो ।
आँधी या तूफान उठा हो,
चमक पड़े बिजली चम, चम, चम ।
वीर शिवाजी के बालक हम ॥

४

तो भी कार्य न छोड़ें हम,
धर्म से मुँह न मोड़े हम ।
कठिनाई से कभी न डरते,
आगे बढ़ते कदम-कदम ।
वीर शिवाजी के बालक हम ॥

५

पर नारी माँ-बेहिन हमारी,
उनकी रक्षा के प्रणधारी ।
तजे कुसंगति; संगति प्यारी,
धर सहन शक्ति हम, हम, हम ।
वीर शिवाजी के बालक हम ॥

६

फैशन त्याग सादगी लावे,
व्यसनोको हम दूर भगावे ।
सैनिक "रमतेराम" जतावे,
हृदिलें मानवता हम, हम, हम ।
वीर शिवाजी के बालक हम ॥

७

विद्या धारण ध्येय हमारा,
जन-सेवा संकल्प हमारा।
ब्रह्मचर्य में नित रत रहकर,
रहें सत्य पर दृढ़ हम. हम, हम।
वीर शिवाजी के बालक हम ॥

८

महार सैनिक को अति प्यारा,
मरून रङ्गका ध्वज यह न्यारा।
सैनिक-शक्ति प्रबलता द्योतक,
झंडा उँचा रहे हमारा—
( किता पा. ९६ )

९

जन-सेवक हैं सैनिक-वर हैं,
दृढ़ता शील दया के घर हैं।
मातृ-भूमि-सेवा-हित करते,
हम हरदम कर श्रम, श्रम, श्रम
वीर शिवजी के बालक हम ॥

महार रेजिमेंटच्या शौर्याची कीर्तीदुदुंभी परदेशांतही वाजू लागली. स्टाफ कॉलेज, वेलिंग्टन (लंडन) कॉलेजने महार रेजिमेंटच्या अतुल पराक्रमाबद्दल अभिनंदन करून प्रत्येक सैनिकाला एक एक नजराणा पाठविला. त्यांनी रेजिमेंटला अभिनंदनपर पत्रही लिहिले. असा मान यापूर्वी कोणत्याही पलटणीला मिळालेला नव्हता. महार रेजिमेंटने आपले नांव भारताच्या इतिहासात उज्वल व अजरामर केले ! !

१ ऑक्टोबर १९५५ रोजी सागर ( मध्यप्रदेश ) येथे महार रेजिमेंटमधील काश्मिर लढ्यांत जे महार सैनिक व अधिकारी रणांगणांत कामास आले; त्यांचे स्मारक म्हणून खेळाचे आखाड बांधण्यांत आले. त्याचे उद्घाटन **जनरल एस. पी. पी. थोरात** यांच्या हस्ते करण्यांत आले. ( टाईम्स, ३-१०-५५ ).

चीन व पाकिस्तान या देशांनी भारतीय प्रदेशावर आक्रमण केले तेव्हां भारताच्या जवानानी मोठ्या धैर्याने या शत्रूबरोबर मुकाबला केला. त्यावेळी अनेक लष्करी अधिकारी आणि जवान यांनी पराक्रमाची शर्थ केली. या शूर वीरांमध्ये महारही होते. त्यांच्या पराक्रमाची जी कांही थोडीबहूत माहिती वर्तमान पत्रांतून प्रसिद्ध झालेली आहे त्यापैकी कांही माहिती मी येथे देत आहे :—

१९६२ आणि १९६३ सालांत महार वीरांनी चीनच्या विरुद्ध ज्या धैर्याने लढे लढविले, त्याबद्दलच्या अनेक रोमांचकारक सत्यकथा व दंतकथा महाराष्ट्रीय समाजात प्रसृत आहेत. सत्यकथेबद्दचे दोन वृत्तपत्रीय पुरावे मी येथे देत आहे —

१)

**बाजी प्रभूच्या जिद्दीने नेफात लढलेला**
**वीर हवालदार कांबळे**
**झुंजार वीरांचा राष्ट्रपतींकडून गौरव**

दिल्ली, दि. १०—नेफामधील सेला उतारावर लढणाऱ्या मिडियम मशिनगन तुकडीचे नेते हवालदार **गोविंद कांबळे** (महार रेजिमेंट) यांनी आपल्या मर्दुमकीची कमाल करून रणांगणावर देह ठेवला. त्यांच्या असामान्य शौर्याबद्दल राष्ट्रपतींनी त्यांना अशोक चक्र ( मरणोत्तर ) दिले आहे.

नेफामधील हेनकर ठाण्याचे प्रमुख **पंढरीनाथ अनंत रेगे** (आसाम रायफल्स) यांनी २० ऑक्टोबरला अवघ्या १०० सैनिकासह ५०० चिन्यानी चढविलेल्या हल्ल्याला निकराने तोंड दिले व प्रत्यक्ष हातघाईच्या लढाईनंतरच आपल्या सैनिकांनी हे ठाणे सोडले. या लढाईत मेजर **रेगे** यांनी जे असामान्य धैर्य व उच्चप्रतीचे नेतृत्व दाखविले याबद्दल त्यांना अशोक चक्र देण्यात आले आहे.

नेफा आघाडीवर असामान्य शौर्य दाखविल्याबद्दल फ्लाईट लेफ्टनंट **कृष्णपंत सेनी, जी. डी. पायलट** सेकंड लेफ्टनंट **सुरेंद्रनाथ टंडण** गढवाल रायफल्स, हवालदार **मलकियत सिंग**, पंजाब रेजिमेंट (मरणोत्तर), लान्स नाईक **हस्तबहादूर गुरुंग,** आसाम रायफल्स, रायफल्समन **बाजीराम थापा**, आसाम रायफल्स, आणि रायफल्समन **पूर्णबहादूर** तामंग, आसाम रायफल्स, यांनाही अशोक चक्र देण्यास मान्यता दिली.

## २) शौर्याचा मूर्तिमंत पुतळा

नेफामधील सेला उतारावर लढणाऱ्या मिडियम मशिनगन्स तुकडीचे नेतृत्व हवालदार **कांबळे** यांच्याकडे होते. १८ नोव्हेंबर १९६२ रोजी चिनी सैन्याने, या विभागावर जोरदार हल्ला केला, शत्रूच्या मशिनगन्समधून आगीचा वर्षाव होत असताही हवालदार **कांबळे** या खंदकातून त्या खंदकाकडे धांव घेऊन जवानांना मार्गदर्शन करीत होते. प्रत्यक्ष समोर ठाकलेला शत्रू, मशिनगन्समधून होणारा गोळ्यांचा वर्षाव त्यांच्या खिजगणतीतच नव्हता. परंतु अखेर त्या घातकी शत्रूच्या गोळ्या, त्या शूर वीराच्या दोन्ही पायांत घुसल्या ! परंतु हा वीर कांही लेचापेचा नव्हता, पाय कामातून गेले तरीही हवालदार **कांबळे** धडपडत धडपडत व असह्य यातना आनंदाने सोशीत मिडियम मशिनगन्सच्या खंदकात परतले. नंतर कंपनीला माघार घेण्यास सांगण्यात आले, त्यावेळी त्यांनी आपल्या कंपनीतील जवानांना माघार घेता यावी म्हणून शत्रूवर गोळ्यांचा वर्षाव चालूच ठेवला. जवान सुखरुप माघारी वळले; परंतु असे करीत असतां भारतमातेचा हा सुपुत्र मात्र झालेल्या जखमांमुळे धारातीर्थी पडला.

मेजर **पंढरीनाथ अनंत रेगे** नेफामधील हेनकर ठाण्याचे प्रमुख होते व त्यांचेपाशी सुमारे १०० जवान होते. २० ऑक्टोबर १९६२ रोजी या ठाण्यावर सुमारे ५०० चिन्यांनी हल्ला केला. रेगे यांच्या नेतृत्वाखालील या १०० जवानांनी आपल्या शक्तीच्या पांचपट असलेल्या या चीनी सैन्याबरोबर अगदी निकाराचा लढा दिला. शत्रूला या ठाण्यावर चार वेळा हल्ला करावा लागला आणि कित्येक चिनी सैनिक बळी

द्यावे लागले. सरते शेवटी हातघाईची लढाई झाल्यानंतरच आपल्या जरनांनी हे ठाणे सोडले. शत्रूला येथे बराच काळ थोपवून धरल्यामुळे दळणवळणाची साधने बराच काळ चालू ठेवता आली. या लढाईत **मेजर रेगे** यांनी असामान्य धैर्य आणि उच्च प्रतीचे नेतृत्व दाखविले" (नवशक्ती, शनिवार ११-१-१९६३, पा. ५)

ज्या भारतीय जवानांनी मर्दुमकीची शर्थ केली त्यांना १) महावीर चक्र २) अशोक चक्र वर्ग १, ३) वीर चक्र ४) अशोक चक्र वर्ग २, आणि ५) अशोक चक्र वर्ग ३; असे महा सन्मानदर्शक पदके देण्याचा निर्णय राष्ट्रपतींनी घेतला. ही पदके कोणाला द्यायची त्यांची नांवे जाहीर करण्यात आली. त्यांत **वीरचक्र** ज्यांना द्यावे त्यांच्या यादीत मेजर **पंढरीनाथ आनंद रेगे** आणि हवालदार **गोविंद कांबळे** (मयत) यांची नावे आहेत. कच्छ युद्धातील वीरांचा गौरव करण्यासाठी राष्ट्रपतींनी २९ जून १९६५ ला जी घोषणा केली तींत पहिल्या महार बटालियनमधील हवालदार **गोपीनाथ भिंगारदिवे** यांना तिसऱ्या श्रेणीत किताब **वीरचक्र** देण्याचे जाहीर करण्यात आले. (नवशक्ती, ३०-६-१९६५, पा. १)

महार रेजिमेंटला ३ फेब्रुवारी १९७० ला सागर (मध्यप्रदेश) येथे राष्ट्रपतींच्या हस्ते ध्वज अर्पण करण्याचे वृत्त 'नवशक्ति' पत्राने २९ जानेवारी १९७० च्या अंकात (पा. ६) प्रसिद्ध केले; तेव्हा सदर पत्राने "सागर येथे भूदलाच्या महार रेजिमेंटमधील शिक्षण पूर्ण केलेल्या; ताज्या दमाचे जवान राष्ट्रध्वजाचा शेव हातात घेऊन राष्ट्रनिष्ठेची शपथ घेत असतांता घेतलेले हे छायाचित्र आहे" असा खुलासा करून ते छायाचित्र प्रसिद्ध करून खालील मजकूर प्रसिद्ध केला :—

**"महार रेजिमेंटला ३ फेब्रुवारी रोजी राष्ट्रपतीच्या हस्ते ध्वज अर्पण केला जाणार.**

**मध्यप्रदेशातील सागर येथे होणारा समारंभ**

(आमच्या प्रतीनिधीकडून)

सागर (मध्यप्रदेश) दि. २८-येत्या दि. ३ फेब्रुवारीचा दिवस हा भारतीय सेनादलातील तरुण महार रेजिमेंटच्या इतिहासांत सुवर्णाक्षरांनी नोंदला जाईल. त्या दिवशी येथील एका थाटाच्या समारंभात राष्ट्रपती **डॉ. व्ही. व्ही. गिरी** हे या शूर व धाडसी महार रेजिमेंटला (नवे नाव कॉस्मॉपॉलिटन) ध्वज अर्पण करणार आहेत.

भारतीय सेनादलातील महार वा कॉस्मॉपॉलिटन, हा बहुमान मिळविणारी सर्वात तरुण रेजिमेंट आहे. तसेच महारांना राष्ट्रपतींनी ध्वज देण्याचा हा पहिला प्रसंग आहे.

## दुर्मिळ बहुमान

**राष्ट्रपतींकडून ध्वज दानाचा सन्मान मिळणे याचा अर्थ, युद्ध व शांततेच्या काळांत एखाद्या रेजिमेंटने केलेल्या बहुमोल सेवेला. सेनादलाच्या सर्वोच्च अधिकाऱ्याने विशेष मान्यता देणे, असा होतो, आणि महार रेजिमेंटच्या अल्पकालीन इतिहासात त्या रेजिमेंटने केलेले पराक्रम हे कोणत्याही रेजिमेंटला भूषणावह वाटणारे आहेत.**

तसे पहाता महार रेजिमेंटचा जन्म १९४१ च्या ऑक्टोबर महिन्यांतीत असला तरी त्यांची परंपरा फार जुनी आहे. अगदी शिवाजीच्या काळापासून व त्यानंतर ब्रिटिशांच्या नेतृत्वाखालील बॉम्बे नेटिव्ह इन्फंट्रीमध्ये महारांनी निष्ठेचे व पराक्रमाचे अपूर्व दर्शन घडविले आहे.

## आधुनिक इतिहास

महारांची वेगळी बटालियन म्हणून पहिला उल्लेख १९१७ सालच्या जुलैमध्ये केलेला आढळतो. त्या वेळी तथाकथित "१११ महार बटालियन" निर्मिण्यांत आली. त्याच दरम्यान चालू असलेल्या पहिल्या जागतिक युद्धात अखेरच्या पर्वातील महार बटालियनची प्रशंसनीय कामगिरी लक्षांत घेऊन ती बटालियन '७१ व्या पंजाब फलटणींत' समाविष्ट करण्यात आली.

स्वातंत्र्योत्तर काळांत महार रेजिमेंटच्या स्वरूपात खूपच बदल झाला आहे. आज या रेजिमेंटमध्ये महारापेक्षा महारेत्तरांचीच भरती अधिक आहे आणि हे भारतातील एकात्मता घडवून आणण्यात भारतीय सेवादलाने बजावलेल्या कामगिरीचे एक महत्वाचे प्रतीक आहे.

## अपूर्व कामगिरी

१९४६ मधील गोष्ट ! त्यावेळी इन्फंट्री रेजिमेंट या नावाने ओळखल्या जाणाऱ्या महार रेजिमेंटने सत्तांतराचे वेळी नागरी अधिकाऱ्यांना सहकार्य करून सुमारे ४० लाख निर्वासितांना, प्रतिकूल परिस्थितीत अत्यंत सुरक्षितपणे भारतात आणण्याची अवघड कामगिरी यशस्वीरित्या पार पाडली आहे.

यानंतर १९४७ मधील पाकचे काश्मिरवरील आक्रमण, १९६२ मधील चीनचे भारतावरील आक्रमण या प्रत्येक वेळी महार रेजिमेंटने गाजवलेला पराक्रम अधिकाऱ्यांच्या प्रशंसेला पात्र ठरत आहे.

आतापर्यन्त या रेजिमेंटने केलेल्या कामगिरीबद्दल त्या रेजिमेंटला दोन महावीर चक्रे; ११ वीर चक्रे: दोन शौर्य चक्रे; व इतर अनेक पारितोषके मिळाली आहेत.

१ डिसेंबर १९४८ पासून 'महार रेजिमेंटल सेंटर' सागर येथे असून सध्या तेथे नव्या रिक्रुटांना नऊ महिन्यांचे शिक्षण देण्यात येते.

येत्या दि. ३ फेब्रुवारी रोजी ध्वज अर्पण समारंभा निमित्त या रेजिमेंटच्या जुन्या निवृत्त सैनिकांचे एक संमेलन भरविण्यात येणार असून त्याला काही हजार लोक उपस्थित रहातील अशी अपेक्षा आहे.

रेजिमेंटमधील जवानांत भावनात्मक ऐक्य वाढीला लागण्यासाठी येथे एक 'ज्ञान मंदिर' म्हणून प्रार्थना स्थान निर्माण करण्यात आले आहे. दुबळे झालेले जवान व त्यांचे कुटुंबीय यांच्या साहाय्यासाठी रेजिमेंटने पुनर्वसनाचे एक कार्य हाती घेतले असून त्या दृष्टीने कुक्कुट पालन केंद्र व गवळीवाडा चालविण्यात येत आहे. आणखी एक कल्याणयोजना म्हणून शिक्षण विषयक सोयी व सवलती निर्माण करण्याचा मानस आहे. परंतु अपुऱ्या निधीमुळे ती योजना इतक्यात फलद्रुप होणे कठीण दिसते. (नवशक्ति, २९-१-१९७०, पा. ६)

राष्ट्रपति **श्री. वराह व्येंकट गिरी** यांनी सागर येथे महार रेजिमेंटला ३ फेब्रुवारी १९७० ला खास भरविलेल्या मोठ्या समारंभात ध्वज दिला, त्याचे वृत्त 'दी टाईम्स ऑफ इंडियाच्या' ४ फेब्रुवारीच्या अंकात पा. ८ वर दिलेले होते. ६ फेब्रुवारीच्या अंकात (पा. १६) टाईम्सने ध्वजार्पण समारंभाचा फोटो दिलेला होता. रेजिमेंटचे जनरल आणि कर्नल व अनेक रणक्षेत्रांवर अतुल पराक्रम करून दाखविणारे महार सैनिक आणि अधिकारी ३ फेब्रुवारीच्या समारंभात उपस्थित होते. महार लोकांनी, शिवाजीचे सैन्य, आणि ब्रिटिशांचे सैन्य, आणि स्वातंत्र्योत्तर कालांत, भारतीय सैन्य, यांच्यात फार मोठ्या मर्दुमकीची कामे केली. याबद्दलचे गौरवपूर्ण उल्लेख राष्ट्रपतींनी आपल्या भाषणात केले. **या रेजिमेंटमध्ये जरी सर्व धर्माचे व प्रांताचे शिपाई आहेत तरी बहुसंख्य शिपाई महार जातीचे आहेत असा खुलासा राष्ट्रपतींनी केला.** ६ फेब्रुवारी १९४८ च्या लढाईत **कृष्णा सोनावणे** या महार सैनिकाने ७०० पाकिस्तानी हल्लेखोर एकट्याने ठार केले, आणि स्वतःच्या अंगात पाकिस्तानी शत्रू सैनिकांच्या गोळ्या शिरल्या असतांना त्याने पाकिस्तानी आक्रमकांना थोपवून धरण्यासाठी लढत लढत प्राणार्पण केले व भारतीय सैन्याचे एक महत्त्वाचे ठिकाण सुरक्षित ठेवले, याचाही राष्ट्रपतींनी उल्लेख केला. हा लढवय्या **आपल्या रेजिमेंटला वीर चक्र मिळवून देणारा पहिला महार सैनिक होय! ते वीरचक्र त्याला मृत्यूनंतर देण्यात आले.** १५ ऑगस्ट १९४७ ला भारत स्वतंत्र झाल्यानंतर पाकिस्तानातून भारतात निर्वासितांना आणताना व कोरिया, कांगो वगैरे देशांत शांतता प्रस्थापित करण्याचे जे कार्य या रेजिमेंटने केले त्याबद्दल आणि १९४७-४८ च्या काश्मिर युद्धात, १९६१ च्या गोवा मुक्तिसंग्रामात, १९६२ च्या लडाख व नेफा संग्रामात आणि १९६५ च्या कच्छ, सियालकोट व लाहोर या संग्रामात महार शिपायांनी जे पराक्रम गाजविले, त्याबद्दलही राष्ट्रपतींनी गौरवाचे उद्‌गार काढले. हा ध्वज गडद चेरी-फळाच्या (अरुन) रंगाचा असून त्यावर रुपेरी दोऱ्याने बंदुकांचे भरतकाम केलेले होते. हे वृत्त असे :-

## "PRESIDENT PRESENTS TO COLOURS TO MAHAR REGIMENT

SAGAR, February 3 : Mahar, one of the youngest of the youngest of the Indian Army received colours from the President, Mr. V. V. Giri, at an impressive function here today.

President at the function were array of generals and colonels of the Regiment and valiant officers of the Mahars who had distinguished themselves in several battles.

Mr. Giri said that the Regiment consisted of men from almost all the states and religions in the country apart from a substantial number of Mahars from Western India. Its career was replete with acts of heroism, gallantry and devotion to duty which anyone could be justifiable proud. The battalions of the regiment had served with distinction during the Jammu & Kashmir operations in 1947-48, liberation of Goa in 1961, in a Ladakh and NEFA in 1962 and Kuach and in the Sialkot and Lahore Sectors in 1965.

The President said that the contingents of the regiment acquitted themselves will in their foreign assignments in Korea and Congo and brought credit not only to the regiment but also to the Indian army and the country. They rendered valuable service in the maintenance of law and order whenever they were called upon by the civil authorities to do so, particularly country and in Nagaland. Thus in war and peace, their record was second to none and was all the more enviable for a young regiment.

### PROUD RECORD

Mr. Giri hoped that the colours which the regiment received would inspire its men to attain greater glory. It was confident that the Jawans of the Mahar would not consider any sacrifice too great to uphold the honour of their colours.

Maj.-Gen. K. V. Krishna Rao explained to press the history and the proud record of the Mahars.

The Mahar soldiers served with distinction in Shivaji's army and later in the Bombay Native Infantry in July 1917. A battalion of the Mahars, called 111 Mahars, was raised and it saw action in the dying phase of World War I. It was later amalgamated with the 71st Punjab Regiment.

The Mahars hoisted their own regimental flag on October 1, 1941, when the last battalion was raised. Soon after some of them served in Iran and Iraq.

## GALLANT ACTION

On February 6, 1948, an unassuming Mahar non-commissioned officer, N. K. Krishna Sonawala (Sonawane), inflicted 700 casualties on the Pakistan raiders and saved a vital position although he was himself severely wounded. He was the first Mahar to have won Vir Chakra for the regiment. Lt. Col. (now Colonel) C. S. Sangha was also decorated with Mahavir Chakra for the commendable courage and leadership during the war against Pakistani.

The regiment has also received 11 Vir Chakras in its young life. It was constituted into an infantry only in 1963-64.

Last year, the regiment was awarded a dull cherry buckle and other special items of dress by the Chief of the Army Staff in recognition of its distinguished service in war and peace.

The colours of the regiment is dull cherry. It is embroidered with guns in silver thread'. (The Times of India 4-2-1970, page 8).

**व्हिक्टर लाँगर** यांचा दी टाईम्स ऑफ इंडिया मॅगेझिन, ता. २६ जानेवारी १९६९ पा. १ यात 'The Rise of The Indian Army' हा लेख प्रसिद्ध झाला होता. त्यात त्यांनी हिंदी सैनिकांचे पोषाख वेळोवेळी कसे होते यांची सहा चित्रे दिली होती. ती १७७३ मऱ्हाट्टा सिपॉय, १८०१ मधील **नाईक**, बॉंबे ग्रेनेडियर बटालियन (युरोपियन), १८३० मधील मद्रास शिपॉय, १८९० मधील प्रायव्हेट, ९ वी बेंगॉल इंफन्ट्री, १९०४ मधील हविलदार मेजर, २५ वी पंजाबीज आणि १९१२ मधील कलर हविलदार, ९५ वी रसेल्स इन्फट्री यांची होत. १७७३, १९०४ आणि १९१२ ची युरोपियन पोषाख आणि डोक्यास मराठी फेटा या स्वरूपाची होती.

लष्करातील घटक **अनेक** आहेत. त्यांच्याबद्दलची माहिती मेजर **सी. एल. प्राऊडफूट** यांनी 'know your Military Terms, या शीर्षकाखाली २३ डिसेंबर १९६२ च्या टाइम्स ऑफ इंडियाच्या अंकात दिली होती. त्या लेखाचा सारांश असा :—

**१) सेक्शन :–** ८ ते १० शिपाई यांची तुकडी सिनिअर एन. सी. ओ. (Non-commissioned officer) **प्रमुख अधिकारी**

**२) प्लटून :–** २५ ते ३५ शिपाई
( ३ ते ४ सेक्शन )
ज्युनिअर ऑफिसर प्रमुख अधिकारी

**३) कंपनी :–** ८० ते १२० शिपाई (३ ते ४ प्लटून्स)
कॅप्टन किंवा मेजर, प्रमुख अधिकारी.

**४) बटालियन :–** ४०० ते ८०० शिपाई.
( ४ ते ६ कंपन्या ) लेफ्टनंट कर्नल प्रमुख अधिकारी.
बटालियन ही पायदळाची लढाऊ घटक होय.

**५) ब्रिगेड :–** ४,००० ते ५,००० शिपाई ब्रिगेडियर प्रमुख अधिकारी ब्रिगेडमध्ये शासन भाग, तोफखाना भाग, आणि शस्त्रागार भाग यातील कांही लोक असतात.

**६) डिव्हिजन :–** १२,००० ते २०,००० शिपाई ( तीन ब्रिगेडस ) मेजर जनरल प्रमुख अधिकारी.

**७) कोअर :–** तीन डिव्हिजनस. लेफ्टनंट जनरल प्रमुख अधिकारी.

**८) आर्मी :–** तीन कोअर्स. सिनियर जनरल प्रमुख अधिकारी, एखाद्या देशांत ब-याच आर्मीज असतात.

**९) आर्मर :–** टॅक्स व आर्मड फोर्स. प्रत्येकात एक मोठी तोफ आणि एक अगर दोन मशीनगन्स असतात.

**१०) सिग्नलस :–** वायरलेस आणि टेलिफोनन्सच्या सहाय्याने रणभूमीवरील अधिकाऱ्यांना संदेश व लेखी खलिते पाठविणारा विभाग.

**११) इंजिनिअर्स :–** माईन फिल्डस तयार करणे, शत्रूंच्या माईन फिल्डस् नष्ट करणे, रस्ते पूल तयार करणे, रेल्वे लाईन्स घालणे, पाणी पुरवठ्याची साधने तयार करणे.

१२) **लॉजिस्टिक्स** :– अन्नसामुग्री, हत्यार पुरवठा आणि संदेश पोहोचविणे, या संबंधी कामे करणारा विभाग.

१३) **पिकेट** :– संरक्षणाचे दृष्टीने अनुकूल अशा ठिकाणांवर (विशेषतः टेकड्यांवर) लहान टोळ्या टेहाळणीसाठी ठेवणे.

१४) **पेट्रोल** :– शत्रूच्या हालचालीची माहिती मिळविण्यासाठी, अगर शत्रूच्या ठिकाणावर छापे घालण्यासाठी, अथवा विशेष महत्वाच्या कामगिरीबद्दल पाठविलेले लोक.

१५) **हत्यारे** :– मॉर्टर (बॉंब दूर फेकणारे), मशिनगन्स, एम्. एम्. जी. (मिडियम मशिनगन्स), लाईट मशिनगन (एल. एम्. जी.) सब मशिनगन, रायफल ग्रेनेड, बझूकां, आणि रेकॉइल लेसगल.

———x———

# चरित्र लेखकाचा अल्पपरिचय

डॉ. बाबासाहेब आंबेडकरांचे चरित्रकार श्री. चां. भ. तथा आबासाहेब खैरमोडे यांचा जन्म पाचवड, ता. खटाव, जि. सातारा, येथे १५ जुलै १९०४ मध्ये झाला.

१९२९ मध्ये बी.ए. झाले. एम्.ए., एल्.एल्.बी. च्या टर्म्स भरल्या परंतु सेक्रेटरीएटमध्ये नोकरी मिळाल्याने परीक्षेस बसले नाहीत. त्यांचे सामाजिक चळवळीवरील लेख व कविता १९२३ ते १९६४ या काळात अनेक नियतकालिकांतून प्रसिद्ध झाल्या. १९२९ साली त्यांचे 'अमृतनाक' हे खंडकाव्य प्रसिद्ध झाले. युनिव्हर्सिटी ऑफ बुस्कानसन (अमेरिका) येथील रॉबर्ट मिलर यांचा "Button Button.. Great-Tradition Little Tradition Whose Tradition?" या शिर्षकाखाली ॲन्थ्रा- पॉलॉजिकल कारर्रली व्हॉ. नं. ३० जानेवारी १९६६ ला लेख प्रसिद्ध झालेला आहे. त्यांत 'अमृतनाक' बद्दल गौरवपर उद्गार काढले आहेत.

बाबासाहेबांच्या 'शूद्र पूर्वी कोण होते,' हिंदु स्त्रियांची उन्नती व अवन्नती यांचे अनुवाद श्री. खैरमोडे यांनी केले ते प्रसिद्ध झाले. श्री. आबासाहेब खैरमोडे यांनी डॉ. बाबासाहेब आंबेडकरांच्या सहवासात आल्यापासून त्यांचे चरित्र लिहिण्याच्या दृष्टीने प्रचंड सामुग्री जमा करून चरित्राचे अठरा खंड प्रसिद्ध करण्याचा संकल्प केलेला होता. १९५२ ते १९६८ पर्यंत ५ खंड प्रसिद्ध झाले. ६ वा खंड छापत असतानाच म्हणजे १८ नोव्हेंबर १९७१ ला त्यांचा मृत्यू झाला.

१९८३ पासून पुढील खंडाचे काम म. रा. साहित्य संस्कृती मंडळाने हाती घेऊन ६, ७, ८, ९, १० व ११ हे खंड प्रसिद्ध झाले. १२ वा खंड मंडळाने हाती घेतला आहे.

पूर्वी प्रसिद्ध झालेल्या चरित्र खंडावरील काही अभिप्राय खंड १ (द्वितीय आवृत्ती) व खंड ५ यांत दिलेले आहेत. यावरून श्री. खैरमोडे यांच्या कर्तृत्वाची अचूक व साधार लिहिण्याच्या प्रवृत्तीची साक्ष पटते.